मुख्यमंत्री ग्राम सडक योजना अंतर्गत सिंधुदूर्ग जिल्ह्यातील पॅ.क्र. SIN-४५ मधील मोंडतर विरवाडी रस्ता, ता.देवगड या रस्त्याच्या कामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** मुग्रायो-२०२२/प्र.क्र.१३३/बांधकाम-४
५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीखः २८ एप्रिल, २०२२

**वाचा :**

१) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०१८/प्र.क्र.१०४/बांधकाम-४, दिनांक ०२ एप्रिल, २०१८.

२) **मुख्य अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांचे पत्र क्रमांकः** मु.अ./प्रमंग्रासयो/५३७/२०२२, दिनांक १७ मार्च, २०२२.

**प्रस्तावना :**

मुख्यमंत्री ग्राम सडक योजने अंतर्गत सिंधुदूर्ग जिल्ह्यातील पॅकेज क्रमांक SIN-४५ मधील मोंडतर विरवाडी रस्ता, ता.देवगड या रस्त्याच्या कामास ग्राम विकास विभागाच्या उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक ०२ एप्रिल, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू.४७४.५० लक्ष इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर कामाचा कार्यारंभ आदेश दिनांक ०६ मार्च, २०१९ रोजी देण्यात आला आहे.

०२. सदर कामाच्या एकुण ५.०२ कि.मी. लांबीमधील अंदाजे २.५० कि.मी. लांबीचा रस्ता खाडी काठाने जात असून रस्त्याची खाडीच्या भरती/ओहोटीमुळे प्रचंड प्रमाणात धुप होत असल्यामुळे तसेच उच्चतम भरती वेळेस अतिवृष्टी झाल्यास पावसाचे पाणी लोकवस्तीत घुसून ग्रामस्थांच्या घरांचे व मालमत्तेचे अतोनात नुकसान होत असल्याने ग्रामस्थांकडून वाढीव लांबीच्या संरक्षक भिंतीची होत असलेली मागणी व कामाच्या मुळ प्रशासकीय मान्यता रकमेमध्ये वस्तु व सेवा कर तसेच भाववाढ फरक रक्कमेचा अंतर्भाव करण्यात आलेला नसल्यामुळे कामाच्या मुळ किंमतीमध्ये वाढ झाल्याने सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव, मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांच्या उक्त वाचा मधील अ.क्र.२ येथील दिनांक १७ मार्च, २०२२ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेला आहे.

०३. विषयांकित कामाच्या मुळ प्रशासकीय मान्यता रकमेमध्ये वस्तु व सेवा कर तसेच भाववाढ फरक रक्कमेचा अंतर्भाव करणे गरजेचे असल्यामुळे, कामाच्या किंमतीमध्ये वाढ झाल्याने सदर कामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय:</u>

मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत सिंधुदूर्ग जिल्ह्यातील पॅकेज क्र. SIN-४५ मधील मोंडतर विरवाडी रस्ता, ता.देवगड या रस्त्याच्या कामात प्रस्तावनेत नमुद कारणांमुळे किंमतीमध्ये वाढ झाल्याने सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता आहे.

०२. उपरोक्त प्रमाणे कामाच्या अंतिम किंमतीमध्ये खालील प्रमाणे वाढ होत आहे.

(Rs.Lakh)

| Package No. | Name of Work | AA Sancation Cost | Tendered Cost | Revised Expenditure | Excess over AA cost | % Excess over AA cost |
|---|---|---|---|---|---|---|
| *1* | *2* | *3* | *4* | *5* | *6* | *7* |
| SIN-45 | मोंडतर विरवाडी रस्ता, ता.देवगड, जि.सिंधुदूर्ग | 474.50 | 493.21 | 544.38 | 69.88 | 14.73 |
| **Total** | | **474.50** | **493.21** | **544.38** | **69.88** | **14.73** |

०३. उपरोक्त आर्थिक विश्लेषनानुसार काम पुर्ण करावयाचे झाल्यास रू.५४४.३८ लक्ष इतका अंतिम खर्च असुन, सदर कामाच्या प्रशासकीय रक्कमेच्या १४.७३ % जास्तीचा म्हणजेच रू.६९.८८ लक्ष जास्तीचा आहे.

०४. वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग तीन अनुच्छेद क्र.६ (२७ अ) नुसार, सुधारीत अंदाजातील आधिक्य सुरूवातीस मंजूर केलेल्या अंदाजित खर्चाच्या १५% मर्यादेपर्यंत मंजूर करण्याचे पुर्ण अधिकार प्रशासकीय विभागास आहे. त्यानुसार मुख्यमंत्री ग्राम सडक योजने अंतर्गत सिंधुदूर्ग जिल्ह्यातील पॅकेज क्रमांक SIN-४५ मधील मोंडतर विरवाडी रस्ता, ता.देवगड या रस्त्याच्या कामास रू.५४४.३८ लक्ष इतक्या रकमेस खालील नमुद केलेल्या अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

- सदर काम ग्राम विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत, प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर व ग्राम विकास विभागाच्या अटी व शर्तीवर कार्यान्वीत करण्यात यावीत.
- सदर कामांची नोंद मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी तयार करण्यात आलेल्या संगणक प्रणालीमध्ये संबंधित कार्यकारी अभियंता यांनी त्वरीत करावी.

**०५.** सदर कामावरील खर्च "मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (००) (०१), मुख्यमंत्री ग्रामीण मार्ग योजना नवीन रस्ते बांधणे व अस्तित्वातील रस्त्यांचे नुतनीकरण, ५३ मोठी बांधकामे सीआरसी-५०५४ ५१५३" या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२२०४२८१५५४१९४३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e86ac5658c4f446f46a56052bf048257ffe4ea09078de9d556ae5babe8adc8b1, pseudonym=37D9D56800E3803E7F4DEAA21F9F7FAB712736F6, serialNumber=481AF6EECE7C1D432D3119135BE703BF6529E7A455A9B17708C677B565D8EE24, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2022.04.28 16:24:18 +05'30'

**(प्रविण जैन)**

**वित्तीय नियंत्रक तथा उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२. जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग.
४. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, कॅम्प ऑफीस, पुणे.
५. खाजगी सचिव, मा. मंत्री (ग्रा.वि.), मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा.अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. मा.सचिव, (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. अधीक्षक अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, कोकण विभाग, ठाणे.
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सिंधुदूर्ग.
१०. कार्यकारी अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, जिल्हा सिंधुदूर्ग.
११. कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदूर्ग.
१३. वित्तीय सल्लागार, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना.
१४. माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य.
१५. निवड नस्ती (कार्यासन बांधकाम-४) ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.